लोक लेखा समितीने शासकीय खर्चमेळाचे काम वित्तीय वर्षाचे लेखे बंद होण्यापूर्वी करण्याबाबत केलेली शिफारस.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
परिपत्रक क्रमांक: खार्चमे 1096/प्र.क्र.22/96/लेखापरीक्षा,
मंत्रालय, मुंबई-400 032, दिनांक 28 फेब्रुवारी, 1996.

वाचा :- (1) परिपत्रक क्रमांक: खर्चमे 1092/प्र.क्र.111/92/लेखापरीक्षा, दिनांक 19 जून, 1992.
(2) परिपत्रक क्रमांक: खर्चमे 1089/प्र.क्र.482/89/लेखापरीक्षा, दिनांक 2 फेब्रुवारी, 1994.
(3) परिपत्रक क्रमांक: खर्चमे 1094/प्र.क्र.45/94/लेखापरीक्षा, दिनांक 22 एप्रिल, 1994.
(4) परिपत्रक क्रमांक: खर्चमे 1095/प्र.क्र.64/95/लेखापरीक्षा, दिनांक 25 ऑगस्ट, 1995.
(5) परिपत्रक क्रमांक: खर्चमे 1095/प्र.क्र.117/95/लेखापरीक्षा, दिनांक 4 जानेवारी, 1996.

## प रि प त्र क

शासकीय खर्चाच्या ताळमेळाचे काम विहित मुदतीत करण्याबाबत शासनाने उपरोक्त परिपत्रकान्वये आदेश निर्गमित केलेले आहेत. विहित मुदतीत खर्चमेळाचे काम पूर्ण होत नाही असे वेळोवेळी झालेल्या बैठकीत लोकलेखा समितीला आढळून आल्यामुळे सन 1995-96 च्या नवव्या महाराष्ट्र विधानसभेच्या, लोकलेखा समितीच्या तिसऱ्या अहवालामध्ये अशी शिफारस केली आहे की, वित्तीय खर्चाच्या ताळमेळाचे काम त्या वर्षाचे लेख्यांचे हिशोब बंद होण्यापूर्वी करण्यात यावे. त्यात दिरंगाई आढळून आल्यास संबंधितांची जबाबदारी निश्चित करून, त्यांच्याविरूध्द प्रचलित नियमानुसार योग्य ती कारवाई करावी. यासंबंधात पुन्हा योग्य त्या सूचना सर्व मंत्रालयीन विभागांना द्याव्यात असे समितीने सूचित केले आहे.

2. लोकलेखा समितीच्या शिफारशीचा गांभीर्याने विचार केल्यानंतर, शासनाचे असे आदेश आहेत की, प्रशासकीय विभागांनी वित्तीय वर्षाच्या खर्चाच्या ताळमेळाचे काम त्या वर्षाचे हिशोब बंद होण्यापूर्वी करावे व या कामात दिरंगाई आढळून आल्यास संबंधितांची जबाबदारी निश्चित करून त्यांच्याविरूध्द प्रचलित नियमानुसार कारवाई करावी.

3. वरील आदेश शासकीय विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील विभागप्रमुख, कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास आणून शासन आदेशांचे काटेकोरपणे पालन होईल याची पुरेपूर काळजी घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ. कृ. गोलतकर,
शासनाचे सहसचिव.
वित्त विभाग.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
उपमुख्य मंत्र्यांचे सचिव,
मुख्य सचिव,
मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभागांचे सचिव/प्रधान सचिव/अपर मुख्य सचिव,

* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा). मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा परीक्षा)-एक, महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-दोन, महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल (लेखा परीक्षा)-दोन, महाराष्ट्र, नागपूर,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
उप संचालक, लेखा व कोषागारे, पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर/अमरावती/कोकण भवन,
अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/औरंगाबाद/नागपूर/नाशिक/अमरावती,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व उप कोषागार अधिकारी,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई 400 614,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र शासन, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली-110 001,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
मंत्रालयाच्या विविध प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील इतर सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
वित्त विभागातील सर्व अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने (ग्रंथालयास 5 प्रती),
निवड नस्ती, लेखापरीक्षा.

---

* पत्राद्वारे.